**राज्यातील शेतमजुरांसाठी व कृषी क्षेत्रात कार्यरत असलेल्या असंघटित कामगारांसाठी विविध कल्याणकारी योजना राबविण्यासाठी व निधीचा स्रोत निश्चित करुन शासनास शिफारशी करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक-बैठक-११२५/प्र.क्र.५३/कामगार-७अ**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २३ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना-**

राज्यात विविध उद्योग/व्यवसाय क्षेत्रात फार मोठया प्रमाणात असंघटित कामगार कार्यरत आहेत. लेबर ब्युरो ऑफ चंदिगढ यांनी जाहिर केलेल्या सर्वेक्षणानुसार महाराष्ट्र राज्यात तीन कोटी सत्तर लाख असंघटित कामगार आहेत. या असंघटित कामगारांना मुख्य प्रवाहामध्ये आणण्याचे उदिष्ट पूर्ण करण्याकरिता असंघटित कामगार सामाजिक सुरक्षा अधिनियम-२००८ व असंघटित कामगार सामाजिक सुरक्षा संहिता-२०२० केंद्र शासनाने लागू केलेली आहे. केंद्र शासनाने असंघटित कामगारांचा राष्ट्रीय डेटाबेस तयार करण्याचा निर्णय घेतला असून, असंघटित कामगारांची नोंदणी करण्याकरिता सन २०२१ रोजी ई-श्रम पोर्टल सुरु करण्यात आले आहे. विविध उद्योग/व्यवसाय क्षेत्रातील असंघटित कामगारांना ई-श्रम पोर्टलवर सद्यस्थितीत नोंदणी करता येते. राज्यात सातत्याने वाढत्या नागरीकरणामुळे व ई-कॉमर्स क्षेत्रामुळे असंघटित क्षेत्रातील कामगारांची सातत्याने वाढ होत आहे.

सदर घटकांकरिता विविध उद्योग/व्यवसाय क्षेत्रातील ३९ क्षेत्रे निश्चित करुन ३४० प्रकारच्या कामांची निश्चिती करण्यात आली व सदर घटकासांठी सामाजिक सुरक्षा म्हणून कल्याणकारी योजना राबविण्याच्या दृष्टीने ३९ आभासी मंडळे (Virtual Boards) स्थापन करण्यास दि. ०६.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. यात शेतमजुर व कृषी संलग्न क्षेत्रात काम करणा-या कामगारांचा देखील समावेश आहे. ई-श्रम पोर्टलवर सद्यस्थितीत शेतमजुर व कृषी क्षेत्रात कार्यरत असलेले ९५ लाख कामगार नोंदीत आहेत.

सदर असंघटित घटकांसाठी विविध कल्याणकारी योजनांची शिफारस करण्याबाबत व नियामक बाबींच्या अनुषंगाने धोरण तयार करण्यासाठी तसेच निधीचा स्रोत निश्चित करण्यासाठी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

असंघटित क्षेत्रातील शेतमजुर व कृषी क्षेत्राशी संलग्नीत असलेल्या कामगारांसाठी सामाजिक सुरक्षा म्हणून कल्याणकारी योजना राबवण्याबाबत शासनास शिफारशी करण्याकरिता व कल्याणकारी

योजनांसाठी निधीचा स्त्रोत निश्चित करण्यासाठी प्रधान सचिव (कामगार) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (कामगार) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (सहकार) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (कृषी) | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव/सचिव (रोहयो) | सदस्य |
| ५ | विकास आयुक्त (असंघटित कामगार) | सदस्य |
| ६ | आयुक्त (कृषी) | सदस्य |
| ७ | आयुक्त (कामगार) | सदस्य |
| ८ | श्री. संतोष कराड, उपसचिव (कृषी) | सदस्य |
| ९ | उपसचिव, कामगार-७ अ | सदस्य सचिव |
| १० | व्यवस्थापकीय संचालक, गोपिनाथ मुंडे उसतोड कामगार महामंडळ, पुणे. | सदस्य |
| ११ | श्री. राजी नायर, संयुक्त राष्ट्र बालनिधी (युनिसेफ). | सदस्य |
| १२ | श्रीमती अल्पा वोरा, संयुक्त राष्ट्र बालनिधी (युनिसेफ). | सदस्य |
| १३ | टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १४ | गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे यांचे प्रतिनिधी | सदस्य |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१. ई-श्रम पोर्टलवर नोंदीत असलेल्या असंघटित क्षेत्रातील कामगारांना सद्यस्थितीत मिळणा-या केंद्रशासनाच्या योजनांचा लाभ, त्यांची संख्या, डेटा निश्चित करणे व राज्यशासनामार्फत लागू करावयाच्या योजनांसंदर्भात शिफारस करणे तसेच सामाईक व वेगवेगळया योजना अभ्यासून (व्दिरुक्ती टाळण्यासाठी) शिफारस करणे.

२. शेतमजुर व कृषी क्षेत्राशी संलग्नीत असलेल्या कामगारांचे निकष ठरविणे.

३. राज्यात शेतमजुर व कृषी क्षेत्राशी संलग्नीत असलेल्या क्षेत्रात लाखो असंघटित कामगार कार्यरत आहेत. सद्यस्थितीत सदर कामगार असंघटित क्षेत्रातील असल्याने कुठल्याही प्रचलित कामगार कायद्यांच्या कक्षेत येत नाहीत. त्यांच्या समस्यांचा अभ्यास करुन त्या संदर्भात शेतमजुर व कृषी क्षेत्रातील असंघटित कामगारांसाठी सामाजिक सुरक्षा म्हणुन योजनांची शासनास शिफारस करणे तसेच कल्याणकारी योजनांसाठी निधीचा स्त्रोत निश्चित करणे.

४. केंद्र शासनाच्या योजना/ सुचनांच्या अनुषंगाने या क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींशी चर्चा करुन तसेच सदर विषयी इतर राज्यांनी तयार केलेल्या धोरणांचा अभ्यास करुन त्या संदर्भात अहवाल तयार करणे.

५. असंघटित कामगारांसाठी दि. ०६.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये उद्योग/व्यवसाय निहाय ३९ आभासी मंडळे (Virtual Boards) स्थापन करण्यात आलेली आहेत त्या बाबतीत एकच महामंडळ असावे किंवा कार्यपध्दती कशा प्रकारची असावी ? या बाबत अभ्यास करणे.

६. निधीचा स्त्रोत निश्चित करुन त्याबाबतची शिफारस करणे.

७. समितीने वरीलप्रमाणे अहवाल तयार करुन तो १ महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०४२३१२०२१९३७१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c9638764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2025.04.23 12:03:17 +05'30'

**(स्वप्निल कापडणीस)**

**उपसचिव (कामगार) , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

३) मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

५) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७) मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) मा. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) मा. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) विकास आयुक्त (असंघटित कामगार) यांचे कार्यालय, प्रभादेवी, मुंबई-१३.

११) आयुक्त कृषी, सेन्ट्रल बिल्डींग, पुणे.

१२) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३) उप सचिव (कामगार-७ अ) उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) श्री. संतोष कराड, उप सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) व्यवस्थापकीय संचालक, गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे.

१६) श्री. राजी नायर, संयुक्त राष्ट्र बालनिधी (युनिसेफ).

१७) श्रीमती अल्पा वोरा, संयुक्त राष्ट्र बालनिधी (युनिसेफ).

१८) निवडनस्ती (कामगार-७ अ), उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

*****